राज्यातील कृषी विद्यापीठांतर्गत कृषी तंत्रनिकेतन अभ्यासक्रमासंदर्भात मार्गदर्शक तत्वे व निकषामध्ये सुधारणा करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्र. मकृप२०१२/प्र.क्र.१०३/७अे
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २६.०५.२०१५

संदर्भ:- (१) कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र. मकृप २०१२/प्र.क्र.१०३/७-अे, दि. २१/६/२०१२
(२) कृषी परिषद कार्यालयाचे पत्र जा.क्र.मकृप/शिक्षण-१/१०१५/१११८, दि. २०/५/२०१५
(३) कृषी परिषद कार्यालयाचे पत्र जा.क्र. मकृप / शिक्षण-१ / १०१५ / ११६२, दि.२६/५/२०१५

प्रस्तावना :-

राज्यातील कृषी विद्यापीठांतर्गत खाजगी संस्थांमार्फत कायम विना अनुदानित तत्वावर चालू असलेल्या कृषी तंत्र विद्यालयांचा अभ्यासक्रम उन्नत करून अर्ध इंग्रजी (Semi English) माध्यमात तीन वर्षांचा कृषी तंत्र निकेतन अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०१२-१३ पासून सुरु करण्यात आला आहे. या अभ्यासक्रमामध्ये विशेषीकरण (specialisation) नाही. त्यामुळे पदवी अभ्यासक्रमाच्या सर्व विद्याशाखांच्या पहिल्या किंवा दुसऱ्या वर्षास प्रवेशास कृषी तंत्र निकेतन पदविकाधारक उमेदवार पात्र ठरत नाहीत. यासंदर्भात निश्चित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वे व निकषांमध्ये सुधारणा करण्याविषयीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या प्रकरणी संदर्भ क्र. १, २, ३ मध्ये नमूद केलेली वस्तुस्थिती लक्षात घेता शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय

संदर्भीय क्र. १ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वामधील निकष **क्रमांक ८ रद्द करण्यात येत आहे.** तसेच मुद्दा क्र. ९ येथील बाब वगळून त्याऐवजी **"कृषि तंत्र निकेतन उत्तीर्ण असलेले (खुल्या प्रवर्गासाठी किमान ६० टक्के व मागास प्रवर्गांसाठी किमान ५० टक्के गुणधारक) उमेदवार फक्त कृषि पदवीच्या (B.sc.Agri.) पहिल्या वर्षात प्रवेशासाठी पात्र असतील. या उमेदवारांसाठी १० टक्के अतिरिक्त जागा असतील व त्या जागा गुणानुक्रमाने भरण्यात येतील"** हा मजकूर टाकण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०५२७११५६११९४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2015.05.27 12:01:00 +05'30'

**(क.य.वंजारे)**
**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल-नि-कुलपती, (कृषी विद्यापीठे) यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. कृषी मंत्री / मा. राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
५. प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (पदुम), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (ग्रामविकास विभाग), मंत्रालय, मुंबई
८. सचिव (माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण), शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. महासंचालक, महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, सर्व्हे क्र. १३२/ब, भांबुर्डा, भोसलेनगर, पुणे ४११ ००७.
१०.कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला
११.कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी
१२.कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी
१३.कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली
१४.आयुक्त, कृषी / पशुसंवर्धन / मत्स्य व्यवसाय / दुग्धव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१६.महालेखापाल, १/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
१७.महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
१८.सर्व कृषी तंत्र निकेतने (संबंधित विद्यापीठांमार्फत)
१९.सर्व उपसचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई